अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह (राजपत्रित गट-अ)
यांची बदलीबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलई-१२१६/१९६७/प्र.क्र.४२०/तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०१७

वाचा :

१) **अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक इएसटी/ अधीक्षक-बदली/२०१६/११५९/कक्ष-२, पुणे, दि.०१.१२.२०१६**

**शासन निर्णय :-**

गृह विभागाच्या अधिनस्त अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नियंत्रणाखालील अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, (राजपत्रित गट-अ) या पदावर शासनाच्या सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१ मधील प्र.क्र.२ कलम ४ (५) नुसार प्रशासकीय कारणास्तव खालील प्रमाणे बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री. रमेश विष्णु कांबळे, अधीक्षक, मध्यवर्ती कारागह | नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह, नाशिक | अमरावती मध्यवर्ती कारागृह, अमरावती |

२. संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/ पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास आपली नवीन पदस्थापनेच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच ते पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाल्याबाबतचा रुजु अहवाल शासनास सादर करावा.

३. संबंधित अधिकाऱ्यांस शासनाच्या पुर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजुर करण्यात येवु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नये. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मुळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावे. मुळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

४. संबंधित अधिकाऱ्याने म.ना.से. (स्वीयेत्तवर सेवा, पदग्रहण अवधी, निलंबन) नियम १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधीत त्याने बदलीच्या ठिकाणी त्याने तात्काळ हजर व्हावे.

५. सदरहु बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणुन बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास ही कृती म.ना.से. (वर्तणुक) नियम १९७९ मधिल नियम २३ चे उल्लघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणुक समजुन त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल, याची संबंधित अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०११५८२८७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.03.21 15:04:20 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२) प्रधान सचिव (अ.व सु.) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
३) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे
४) कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे/पश्चिम विभाग, पुणे/ मध्य विभाग, औरंगाबाद/ पूर्व विभाग,नागपूर
५) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर
७) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई
८) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१०) संबंधीत अधिकारी (व्दारा अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे)
११) निवड नस्ती कार्यासन तुरुंग-१